महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील
"वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांचा राजीनामा
मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः राजीना-२०२१/प्र.क्र.५३/सेवा-३**
दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: १२ नोव्हेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र. ३३/९२/ ८, दिनांक ०२/१२/१९९७.**

**प्रस्तावना :-**

खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार / स्वतंत्र निवड मंडळामार्फत वैद्यकीय अधिकारी गट-अ या पदावर नामनिर्देशनाने झाली असुन त्यांनी अर्जान्वये शासन सेवेतील त्यांचा वैद्यकीय अधिकारी गट-अ या पदाचा राजीनामा शासनास सादर केलेला आहे.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वैद्यकिय अधिकारी यांनी राजीनामा मंजूर करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता करीत असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम २२ (१) मधील तरतुदीनुसार तसेच, संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार त्यांचा राजीनामा त्या तक्त्यातील त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.४ मध्ये नमूद दिनांकास शासनास राजीनामा मंजूरीसाठी दिलेल्या सूचनेनुसार स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकापासून (म.नं.) त्यांचा राजीनामा मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | कार्यालय | राजीनामा दिल्याचा दिनांक | राजीनामा स्विकारल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | डॉ. श्रीमती वंदना श्रीराम चौसाळकर | जिल्हा रुग्णालय बीड, जि. बीड | दिनांक ०४.०९.२०१९ | दिनांक ०४.०९.२०१९ |
| २) | डॉ. पल्लवी सुभाषचंद्र कारेमोरे | उपजिल्हा रुग्णालय तुमसर, जि. भंडारा | दिनांक ०१.०९.२०१४ | दिनांक ०१.०९.२०१४ |
| ३) | डॉ. नेहा जवाहर बागडी | उपजिल्हा रुग्णालय हिंगणघाट, जि. वर्धा | दिनांक १८.०८.२०१७ | दिनांक १८.०९.२०१७ |
| ४) | डॉ. निलेश भिमराज तोडकरी | कोयना प्रकल्प रुग्णालय, कोयनानगर, जि.सातारा | दिनांक २०.०३.२०२१ | दिनांक २०.०४.२०२१ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५) | डॉ. आशिष गुलाबराव विटणकर | फ़िरते आरोग्य पथक कोरची, जि. गडचिरोली | दिनांक ०५.०९.२०१९ | दिनांक ०५.०९.२०१९ |
| ६) | डॉ. आशिष गुलाबचंद्र हिरावे | ग्रामीण रुग्णालय वरणगाव, जि. जळगाव | दिनांक ०२.०७.२०१८ | दिनांक ०२.०७.२०१८ |

२. सदर शासन आदेश वाचा येथे नमूद शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र. ३३/९२/ ८, दिनांक ०२/१२/१९९७. अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार व त्यातील तरतुदीनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम २२ (१) मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२१५१६५१७३१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, pseudonym=B459C42CF5ECF9E88B3EDB04BD5126A3A7687178, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2021.11.12 15:34:11 +05'30'

**( अ. स. जाधव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा संचालक, रा.आ.अ, आरोग्य भवन,मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई
७. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ (लातूर, नागपूर व नाशिक.)
८. जिल्हा शल्य चिकित्सक (बीड, भंडारा, वर्धा, सातारा, गडचिरोली व जळगाव.)
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (बीड, भंडारा, वर्धा, सातारा, गडचिरोली व जळगाव.)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (बीड, भंडारा, वर्धा, सातारा, गडचिरोली व जळगाव.)
११. संबंधित वैद्यकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत.
१२. निवडनस्ती (कार्यासन, सेवा-३).